**सार्वत्रिक बदल्या सन २०११**
मुख्य रसायन शास्त्रज्ञ, गट-ब

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग,**
शासन आदेश क्रमांक : बदली २०११/प्र.क्र.४८(१)/सेवा-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २०११

आदेश : सामान्य राज्यसेवा गट-ब (वेतनबँड ९३००-३४८००+ ग्रेड वेतन रु.४४००)मधील मुख्य रसायन शास्त्रज्ञ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकिय कारणास्तव खालीलप्रमाणे बदल्या करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | मुख्य रसायन शास्त्रज्ञ अधिकाऱ्याचे नांव | सध्याची पदस्थापना | बदलीने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. हेमंत कुलकर्णी | राज्य आरोग्य प्रयोगशाळा, पूणे | जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा, सांगली येथे रिक्त पदावर. |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा, संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजुर करण्याऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यांनतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे. जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्याची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थानेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचे विरुध्द वेळीच प्रशासकिय कारवाई सुरु करावी, जेणेकरुन अधिकारी वेळीच नवीन पदस्थापनेवार हजर होतील.

६.     वरील बाबी विचारात घेऊन या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत ठेवावे व अनुपालन अहवाल शासनास विहीत कालमर्यादेत सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चि. नि. सुर्यवंशी)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रति,
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सह संचालक, आरोग्य सेवा (प्रशासन), मुंबई
उप संचालक, आरोग्य सेवा, पूणे.
राज्य आरोग्य प्रयोगशाळा, पुणे,
जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा, सांगली
महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पूणे/ सांगली
स्वीय सहायक (मा. मंत्री (आरोग्य) / मा. राज्यमंत्री (आरोग्य)
स्वीय सहायक (अ.मु.स. (आरोग्य व कुटूंब कल्याण) , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संबंधित अधिकारी (संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांच्यामार्फत)
निवड नस्ती (सेवा-१)

संगणक सांकेतांक · २०११०६०१११०९११००१

२०११०६०१११०९११००१